प्रादेशिक परिवहन कार्यालय, मुंबई (मध्य), (पश्चिम) व उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, सातारा येथे रोलर ब्रेक टेस्टर उभारण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

### शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०८१८/प्र.क्र.१५३/परि-४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ०६ ऑगस्ट २०१८

**वाचा :**

१) **परिवहन आयुक्त कार्यालय,मुंबई यांचे पत्र क्र.PIL२८/२०१३/०२१६/न.क्र.०४/ का१०(१) /जा.क्र.११८७७२ , दि.०३.०८२०१८**

२) **गृह (परिवहन) विभाग,शासन निर्णय क्र. एमव्हीडी-१११७/प्र.क्र.२९७/परि-४, दि.३०.११.२०१७**

**प्रस्तावना :**

जनहित याचिका क्र.२८/२०१३ मध्ये मा. उच्च न्यायालय,मुंबई यांनी वाहनाची योग्यता प्रमाणपत्र तपासणीसाठी परिवहन कार्यालयाजवळ २५० मीटर लांबीचा ब्रेक टेस्ट ट्रॅक तयार करण्याबाबत आदेश दिले आहेत. प्रादेशिक परिवहन कार्यालय, मुंबई (मध्य), (पश्चिम), (पूर्व), उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, बोरिवली व सातारा येथे २५० मी. लांबीचा ब्रेक टेस्ट टॅक उभारणी करीता जागा मिळविण्याचे प्रयत्न चालू असून प्रादेशिक परिवहन कार्यालय, मुंबई (पश्चिम) /अंधेरी येथे संदर्भ क्र.२ येथील दि.३०.११.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्राप्त झालेली जागा सीआरझेड क्षेत्रात असल्यामुळे या ठिकाणी २५० मी. लांबीचा ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारता येणार नाही. प्रादेशिक परिवहन कार्यालय, मुंबई (मध्य), (पश्चिम), उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, सातारा याठिकाणी रोलर ब्रेक टेस्टर उभारण्याकरीता जागा उपलब्ध आहे. त्यामुळे प्रादेशिक परिवहन कार्यालय, मुंबई (मध्य),(पश्चिम) व उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, सातारा येथे रोलर ब्रेक टेस्टर उभारण्याच्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

प्रादेशिक परिवहन कार्यालय, मुंबई (मध्य), (पश्चिम) व उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, सातारा येथे रोलर ब्रेक टेस्टर उभारण्यासाठी बांधकाम व उपकरणाचा खर्च मिळून साधारणतः प्रत्येकी ५० ते ७५ लाख इतका खर्च अपेक्षित आहे. सबब, सदर ३ ठिकाणी मिळून अंदाजे रु.२.०० कोटी खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. यामधील उपकरणांची खरेदी ही GeM Portal वरुन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च"मागणी क्र.बी-३, २०४१ वाहनांवरील कर, (०१)(०६) वाहन चालविण्यासाठी चाचणी घेताना गुणात्मक वाढ करण्याकरिता पायाभूत सोयीमध्ये दर्जावाढ करणे, कृत्रिम चाचणी पथ बांधणे (कार्यक्रमांवरील) (२०४१ ०३२१) १३-कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग-एक, उपविभाग-५, अ.क्र.३ व सा.बां.विभाग नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ नुसार तसेच, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ मधील परिच्छेद क्र.६ अ) नुसार असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०६१२३२५१६७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2018.08.06 12:38:09 +05'30'

**(द.ह. कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. परिवहन उप आयुक्त (प्रशासन/संगणक/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
७. प्रादेशिक परिवहन अधिकारी, मुंबई (मध्य)/(पश्चिम)/ कोल्हापूर
८. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी,सातारा
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी,सातारा
१२. अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवडनस्ती (परि-४)